महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक -पद्म १०१०/प्र.क्र. ७४/३१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ०३ जुलै, २०१०.

## प रि प त्र क

प्रजासत्ताक दिन दि.२६ जानेवारी २०११ रोजी घोषित होणा-या पद्म पुरस्काराकरीता (पद्मश्री, पद्मभूषण, पद्मविभूषण) शिफारशी केंद्र शासनाकडे पाठवावयाच्या आहेत. पद्म पुरस्कार हे सर्वोच्च नागरी पुरस्कारांपैकी एक असून ते अतिशय प्रतिष्ठेचे असतात. हे पुरस्कार विविध क्षेत्रांमधील उल्लेखनीय सेवेबद्दल दिले जातात. या क्षेत्रांची स्पष्टीकरणात्मक यादी सोबत जोडली आहे. पद्म पुरस्कारांकरीता शिफारशी करतांना केंद्र शासनाने पुढीलप्रमाणे निकष सुचविले आहेत:-

१) शिफारस करताना संबंधित क्षेत्रातील अत्युत्कृष्ट कार्य (Excellence Plus) हा निकष असावा. या उल्लेखनीय कार्यामध्ये समाजसेवा हाही एक घटक असावा.

२) पुरस्कारासाठी नावे सुचवताना समाजातील अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग, महिला, अपंग व कमकुवत घटकांमधील व्यक्तींचा विचार व्हावा.

३) राज्य सरकारने त्यांच्याकडे असलेल्या केंद्र सरकारच्या अधिकाऱ्यांची शिफारस केंद्र सरकारच्या संबंधित विभागाच्या सहमतीने करावी.

४) राज्य सरकारच्या सेवेत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांची शिफारस करताना मंत्रालयीन प्रशासकीय विभागामार्फतच करण्यात यावी.

५) शक्यतो मरणोत्तर पुरस्काराची शिफारस करु नये. अपवादात्मक प्रकरणामध्ये जानेवारी, २०१० नंतर निधन झालेल्या व्यक्तींची शिफारस करावी. त्यापूर्वी निधन झालेल्या व्यक्तींची पद्म पुरस्कारासाठी शिफारस करु नये.

६) पद्मश्री पुरस्कार प्राप्त केल्यानंतर ५ वर्षांनी पद्मभूषण पुरस्कारासाठी मान्यवरांची शिफारस करावी. तसेच, पद्मभूषण प्राप्त केल्यानंतर ५ वर्षांनी पद्मविभूषण पुरस्कारासाठी मान्यवरांची शिफारस करावी. तथापि, हि मर्यादा अपवादात्मक प्रकरणांमध्ये शिथील करण्यात यावी.

उपरोक्त निकषांच्या आधारे शिफारस योग्य असतील असे प्रस्ताव या विभागाकडे दिनांक ०७ ऑगस्ट, २०१० पर्यंत निश्चितपणे पाठवावेत.

१. पात्र व्यक्तींचा शोध घेतांना वृत्तपत्रे किंवा इतर कोणत्याही प्रसिध्दी माध्यमांद्वारे जाहिराती देऊन नावे मागविण्यात येऊ नयेत.

२. सर्व क्षेत्रीय कार्यालयांनी त्यांचे प्रस्ताव संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत पाठवावेत.

३. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, पद्म पुरस्कारांबाबत सर्व प्रस्ताव त्यांच्या अभिप्रायांसह या विभागाकडे दिनांक ०७ ऑगस्ट, २०१० पर्यंत निश्चितपणे पाठवावेत.

४. सर्व विभागीय आयुक्तांना सूचित करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील जिल्हाधिकाऱ्यांकडून प्रस्ताव प्राप्त करुन एकत्रित प्रस्ताव शासनास त्यांच्या शिफारशीसह पाठविण्यात यावेत.

५. प्रस्ताव पाठवितांना सोबत जोडलेल्या विहित नमुन्यामध्ये पाठवावेत. तसेच त्यांच्या कार्याची माहिती सायटेशनच्यां स्वरुपात इंग्रजीमध्ये दोन प्रतीत पाठवावी. प्रत्येक प्रस्ताव स्वतंत्ररित्या पाठवावा. प्रस्तावासोबत संबंधित व्यक्तीचे छायाचित्र, वाङ:मय, वृत्तपत्रीय कात्रणे व इतर साहित्य पाठवू नये.

६. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, जिल्हाधिकारी कार्यालयाकडून, त्यांना प्राप्त झालेले प्रस्ताव पद्म पुरस्कारासाठी विहीत केलेल्या निकषाची छाननी न करता जसेच्या तसे शासनास सादर केले जातात. यास्तव, ज्या व्यक्तीची शिफारस करावयाची आहे ती व्यक्ती उपरोक्त निकषांच्या आधारे पद्म पुरस्काराकरीता पात्र आहे किंवा कसे याबाबत जिल्हाधिकारी यांनी पूर्ण खात्री करुन घ्यावी व आपल्या अभिप्रायासह विहीत प्रपत्र व इंग्रजीमध्ये सायटेशन यासह प्रस्ताव शासनास पाठवावा.

७. प्रस्तावं विहीत नमुन्यात इंग्रजीमध्ये २ प्रतीत पाठवावा.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०१००७०५१९३०२७००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(राजेंद्र बोरकर)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

सहपत्रे : वरीलप्रमाणे.

प्रत :-
मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मुख्य सचिव
सर्व विभागीय आयुक्त,
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, विधानभवन, मुंबई (पत्राने),
सर्व जिल्हाधिकारी,
प्रोथोनोटरी ॲन्ड सिनियर मास्टर उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
रजिस्ट्रार उच्च न्यायालय (अपिलेट साईड), मुंबई (पत्राने),
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती.

## Illustrative List of Fields

1. **Art** (includes Music, Painting, Sculpture, Photography, Cinema, Theatre etc.)

2. **Social work** (includes social service, charitable Service, contribution in Community Projects etc.)

3. **Public Affairs** (includes Law, Public Life, Politics, etc.)

4. **Science & Engineering** (includes Space Engineering, Nuclear Science, Information Technology, Research & Development in Science & its allied subjects etc.)

5. **Trade & Industry** (includes Banking, Economic Activities, Management, Promotion of Tourism, Business etc.)

6. **Medicine** (includes medical research, distinction/specialization in Ayurveda, Homeopathy, Sidhha, Allopathy, Naturopathy etc.)

7. **Literature & Education** (includes Journalism, Teaching, Book composing, Literature, Poetry, promotion of education, promotion of literacy, Education Reforms etc.)

8. **Civil Service** (includes distinction/excellence in administration etc. by Government Servants)

9. **Sports** (including popular Sports, Athletics, Adventure, Mountaineering, promotion of sports, Yoga etc.)

10. **Others** (fields not covered above and may include propagation of Indian Culture, protection of Human Rights, Wild Life protection/conservation etc.)

------

Annex - II

# PROFORMA FOR PADMA AWARD

| | | |
|---|---|---|
| 1. | **Name:**<br><br>(a) First Name<br>(b) Last Name | |
| 2. | Sex (Male/Female) | |
| 3. | Date of Birth/Age | |
| 4. | Place of Birth<br>(if known) | |
| 5. | Nationality | |
| 6. | Postal Address<br>with Telephone/email etc. | |
| 7. | Religion | |
| 8. | Category (SC/ST/OBC/General) | |
| 9. | Profession or Occupation<br>(with designation/office held) | |
| 10. | Field of activity *<br>viz., Art, Sports, Social work, etc. | |
| 11. | Padma Award for which name is recommended, viz. 'Padma Vibhushan', 'Padma Bhushan' or 'Padma Shri' | |
| 12. | Padma Award conferred, if any, in the past. | |
| 13. | **Citation** | This should be in the form of a write up in narrative form indicating distinctions/ achievements obtained in the concerned field of activity. (in approx. two pages) – **please attach separate sheets**. |

* An illustrative list of fields is annexed for reference.